चंद्रपूर जिल्ह्यातील पर्यावरण विषयक अधिस्थगन (Moratorium) मुळे बाधित विविध उद्योगांना सामुहिक प्रोत्साहन उपभोगण्याचा कालावधी २ वर्षापर्यंत वाढविण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय, क्रमांक साप्रोयो २०१७/प्र.क्र. ७३/उद्योग-८,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १०/०४/२०१७

वाचा-:

१) शासन निर्णय उ.ऊ.व कामगार विभाग क्रमांक मंउस-२०१६/प्र.क्र.२५/उ-८, दि. ०५/०३/२०१६.
२) शासन निर्णय उ.ऊ.व कामगार विभाग क्रमांक मंउस-२०१६/प्र.क्र.२५/उ-८. दि. २२/०९/२०१६.

प्रस्तावना :-

शासन निर्णय दि. ०५/०३/२०१६ व २२/०९/२०१६ नुसार मराठवाडा व विदर्भातील जिल्ह्यात यापुढे स्थापन होणाऱ्या व ज्या विशाल व अतिविशाल उद्योगांना ५० टक्के ढोबळ मुल्यवर्धित करावर आधारित अथवा १००% निव्वळ मुल्यवर्धित करावर आधारित देकार पत्र देण्यात आली आहेत तथापि दिनांक ०१/०४/२०१६ पर्यंत पात्रता प्रमाणपत्र देण्यात आलेले नाही अशा घटकांना देखील १०० टक्के ग्रॉस व्हॅट वर आधारित औद्योगिक प्रोत्साहने देण्याचा निर्णय घेतला आहे तसेच विदर्भ व मराठवाडा क्षेत्रातील ज्या विशाल /अतिविशाल प्रकल्पांचा औद्योगिक विकास अनूदान उपभोगण्याचा कालावधी दिनांक ०१/०४/२०१५ रोजी चालू होता व या अनुज्ञेय अनुदान उपभोगण्याच्या कालावधीमध्ये विशाल/ अतिविशाल प्रकल्पांना एकूण भांडवली गुंतवणूकीच्या ५० टक्के औद्योगिक विकास अनुदानाची प्रतिपुर्ती झालेली नव्हती अशा विशाल /अतिविशाल प्रकल्पांना औद्योगिक विकास अनुदान उपभोगण्याचा कालावधी प्रकल्पातील भांडवली गुंतवणूकीच्या ५०% प्रतिपूर्ती होईपर्यंत अथवा अतिरिक्त ५ वर्ष या पैकी जे कमी असेल तेवढ्या कालावधी करीता अनुदान उपभोगण्याचा कालावधी अनुज्ञेय करण्यात आला आहे. तथापि, चंद्रपूर जिल्ह्यात पर्यावरण विषयक अधिस्थगन सन २०१० ते २०१६ पर्यंत असल्याने सदर ६ वर्षात जिल्ह्यातील मोठ्याप्रमाणावर असलेल्या स्टील व सिमेंट उद्योगांना उत्पादन करता आले नाही अथवा कमी प्रमाणात उत्पादन करावे लागले. त्यामुळे सामुहिक प्रोत्साहन योजना अंतर्गत अनुदान उपभोगण्याचा कालावधी काही उद्योग घटकांचा संपुष्टात आल्याने असे उद्योग आर्थिक अडचणीत आले आहेत. अशा उद्योग घटकांनी पर्यावरण विषयक अधिस्थगणामुळे (Moratorium) व्यतीत झालेला कालावधी येवढा सामुहिक प्रोत्साहन उपभोगण्याचा अवधी वाढविण्याची विनंती केली आहे. घटकांची विनंती विचारात घेवून सामूहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत विशाल व अतिविशाल प्रकल्पांच्या बाबतीत मंत्रिमंडळ उप समितीने दि. २३/०३/२०१७ बैठकीत चंद्रपूर जिल्ह्यातील पर्यावरण विषयक अधिस्थगन

(Moratorium) मुळे बाधित विविध उद्योगांना सामुहिक प्रोत्साहन उपभोगण्याचा कालावधी वाढविण्याबाबतच्या प्रस्तावावर घेतेलेल्या निर्णयानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय -:</u>**

चंद्रपूर जिल्ह्यातील विशाल/अतिविशाल प्रकल्पांना पर्यावरण विषयक अधिस्थगनामुळे (Moratorium) बाधीत उद्योगांना २ वर्ष अनुदान उपभोगण्याचा कालावधी अनुज्ञेय पात्र गुंतवणूकीच्या मर्यादेत वाढविण्यात येत आहे. ज्या विशाल/अतिवशाल प्रकल्पांचा औद्योगिक विकास अनूदान उपभोगण्याचा कालावधी दिनांक ०१/०४/२०१५ रोजी चालु होता त्यांना सदर लाभ अनुज्ञेय होईल.

२. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०४१०११३३२७२०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, serialNumber=d337930b14433dc62c0154af2bbc60bb5a6edcaa66b7f34596c50a27eb0f6333, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2017.04.10 11:37:04 +05'30'

**( संजय इंगळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मंबई
२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (नगर विकास-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC), मुंबई
९) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१०) विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई
११) मा. मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३) मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (उद्योग-८)